जिल्हा परिषदेच्या शाळांमध्ये कंत्राटी तत्वावर भरण्यात आलेल्या शिक्षकांच्या मानधनावरील खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वेतन-१२२३/प्र.क्र.५२/टीएनटी-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १३ मार्च, २०२४

**संदर्भ :-**

१) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे क्र. प्राशिसं-२०२३/कंसेवावेतन/ अंदाज/२०१/००३९५, दिनांक १२.०१.२०२४
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: -पुनर्वि-२८२३//प्र.क्र.१०२/अर्थसंकल्प, दिनांक १२.०३.२०२४

**प्रस्तावना:-**

राज्यामध्ये पवित्र प्रणालीमार्फत नियमित शिक्षक भरती मधून शिक्षक उपलब्ध होईपर्यंत विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान टाळण्यासाठी जिल्हा परिषदेच्या शाळेमध्ये सेवानिवृत्त शिक्षक कंत्राटी तत्वावर तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्याबाबत शासनाकडून दिनांक ०७.०७.२०२३ रोजीच्या पत्रान्वये निर्णय घेण्यात आला आहे. सदर बाब कंत्राटीसेवा याखाली लाक्षणिक पुरवणी मागणीद्वारे विधानमंडळाच्या निदर्शनास आणून त्यास मान्यता प्राप्त झाली आहे.

२. रायगड, पालघर, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, बुलढाणा, या जिल्हयामध्ये सेवानिवृत्त शिक्षकांना जिल्हा परिषदेच्या शाळांमध्ये कंत्राटी तत्वावर तात्पुरत्या स्वरुपात भरण्यात आलेल्या शिक्षकांच्या मानधनाकरिता शिक्षण संचालक (प्राथमिक) यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये रक्कम रु.११,४०,९०००/- एवढया निधीची आवश्यकता असल्याचे कळविले आहे. सदर निधीपैकी रु. ३,४०,०९,०००/- इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध झालेला असून सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जिल्हा परिषदेच्या शाळांमध्ये कंत्राटी तत्वावर तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात आली असून सदर शिक्षकांचे मानधनाकरिता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध तरतूदीमधून रायगड, पालघर, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, बुलढाणा या जिल्हयामध्ये सेवानिवृत्त शिक्षकांना खाली नमूद केल्यानुसार रु. ३,४०,०९,०००/- ( रुपये तीन कोटी चाळीस लाख नऊ हजार फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | नियुक्त शिक्षकांची संख्या | रक्कम रुपये हजारात |
|---|---|---|---|
| १ | रायगड | ६४ | ४००० |
| २ | पालघर | ४६ | ४८०० |
| ३ | रत्नागिरी | २२ | २३३२ |
| ४ | सिंधुदूर्ग | ५३ | १७१७ |
| ५ | बुलढाणा | १८१ | २११६० |

२.  सदर खर्च "मागणी क्रमांक ई-२, २२०२-(०१)(०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना संप्रयोजन अनुदाने (अनिवार्य) (२२०२०१७३) १० कंत्राटी सेवा " या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

३.  सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४.  सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २०६/व्यय-५, दिनांक १३.०२.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१३१६०९१९२३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.13 16:19:20 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता:-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक/प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई /कोल्हापूर/ अमरावती
४. शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि.प., रायगड/ पालघर/ रत्नागिरी/सिंधुदूर्ग/बुलढाणा
५. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड/ पालघर/ रत्नागिरी/सिंधुदूर्ग/बुलढाणा
६. मुख्य लेखा तथा वित्त अधिकारी, जि.प., रायगड/ पालघर/ रत्नागिरी/सिंधुदूर्ग/बुलढाणा

**प्रत:- माहितीसाठी**

१. वित्त विभाग /(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
२. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. कक्ष अधिकारी (एस एम ४), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. निवड नस्ती (टीएनटी-३)(प्र.क्र. ५२/२०२३).